सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,औरंगाबाद, या कार्यालयाच्या आस्थापनेवरील रोजंदारी तत्वावर निर्माण करण्यात आलेल्या गट "क" आणि गट "ड" मधील अस्थायी पदांना मुदतवाढ.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्र.एसपीआय-२०१०/१४७/प्र.क्र.५४/२८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : **२३.०७.२०१०.**

**वाचा:** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:संकीर्ण-२००२/१९७३/प्र.क्र.२११/२००२/२८, दिनांक १६ ऑक्टोबर, २००२.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसपीआय-२००८/१८७२/प्र.क्र.३७४/२००८/२८, दिनांक २१.०३.२००९.
४) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद, यांचे क्र.०००४-एसपीआय-१/४५०५ दिनांक ३१.१२.२००९ चे पत्र.

**शासन निर्णय :**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवर संदर्भाधीन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र संकीर्ण-२००२/१९७३/प्र.क्र.२११/२००२/२८, दिनांक १६ ऑक्टोबर, २००२ अन्वये "क"आणि गट "ड" मधील ४ पदे रोजंदारी तत्वावर निर्माण करण्यास आणि सदर पदे कंत्राटी पध्दतीने भरण्यास शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसपीआय-२००८//(प्रक्र.३७४/२००८)/२८, दिनांक २१.०३.२००९ अन्वये मुदतवाढ देण्यात आली आहे.

आता सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवरील रोजंदारी तत्वावर निर्माण करण्यात आलेली खालील गट "क" आणि गट "ड" मधील ४ अस्थायी पदे दिनांक १.३.२०१० ते २८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| | **गट क** | | |
| १ | शारिरीक प्रशिक्षण निदेशक | रु.४०००-१००-६००० | १ |
| २ | भांडारपाल | रु.३०५०-७५-४५९० | १ |
| | **गट ड** | | |
| ३ | पहारेकरी | रु.२५५०-५५-३२०० | १ |
| ४ | मसालची | रु.२५५०-५५-३२०० | १ |
| | एकूण | | ४ |

२.	यासाठी होणारा खर्च  मागणी क्रमांक -ए- ५, "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (२००) इतर कार्यक्रम (००) (०५)  सेवा पूर्वाध्ययन संस्था," (२२३५००७  १) योजनेतर"  या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३.	शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक  २०१००७२३१३५२२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**(अ.द.जोशी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको एन १२, सेक्टर-३ , मौलाना आझाद कॉलेजच्या मागे,  नविन औरंगाबाद - ४३१ ००३,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

महालेखापाल (लेखा व परिक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय,औरंगाबाद,

सामान्य प्रशासन विभागे, कार्या - २५.

वित्त विभाग, व्यय-४, वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

निवड नस्ती ( २ प्रती ).